**ज्येष्ठ कवी वि.वा शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा दिनांक २७ फेब्रुवारी हा जन्मदिवस "मराठी भाषा गौरव दिन" म्हणून साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः मभादि-२०१८/प्र.क्र.१६३/भाषा-३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक: ७ फेब्रुवारी, २०१९**

__वाचा__ :- मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.मभादि-१०१२/प्र.क्र.८८/२०१२/भाषा-३, दिनांक २१ जानेवारी, २०१३.

__परिपत्रक__ :-

वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांनी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक क्षेत्रामध्ये मोलाचे योगदान दिले असून, मराठी भाषा ही ज्ञानभाषा होण्यासाठी अथक परिश्रम घेतले आहेत. आपल्या मातृभाषेचा गौरव म्हणून वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा दिनांक २७ फेब्रुवारी हा जन्मदिन "मराठी भाषा गौरव दिन" म्हणून साजरा करण्याच्या सूचना यापूर्वी दिनांक २१ जानेवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयास अनुसरुन राज्यातील सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालय प्रमुख यांना मंगळवार, दिनांक २७ फेब्रुवारी, २०१९ रोजी पुढील विविध उपक्रम आयोजित करुन समारंभपूर्वक “मराठी भाषा गौरव दिन” सोहळा साजरा करण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.

__उपक्रमांची सूची__ :-

१) “मराठीतील म्हणींचे जतन व संवर्धन ही यंदाच्या मराठी भाषा गौरव दिनाची मध्यवर्ती संकल्पना आहे.
चला मराठी म्हण जपू या ! मराठीचे धन जपू या !
चला मराठी म्हण जपू या ! मराठीचे मन जपू या !
या घोषवाक्यांसह “म्हणी” बाबतच्या विविध स्पर्धा योजणे, भित्तीपत्रकांद्वारे प्रसार माध्यमांवर म्हणींचा प्रसार, म्हणींची पुस्तके व कोश यांबाबंत चर्चा, परिसंवाद, व्याख्याने.... इत्यादी उपक्रम योजावेत.

२) सन २०१८-१९ हे वर्ष ज्येष्ठ साहित्यिक, गायक, संगीतकार स्व.पु.ल.देशपांडे व स्व.ग.दि.माडगुळकर यांचे जन्मशताब्दी वर्ष म्हणून साजरे करण्यात येत आहे. या दोन महान व्यक्तींच्या साहित्यावर आधारित कार्यक्रम आयोजित करावेत.

३) भाषा संचालनालयाचे परिभाषा कोश (https://play.google.com/store/apps/details?id=gov.maharashtra.shabdkoshapp) आणि मराठी विश्वकोश (https://play.google.com/store/apps/details?id=com.bookganga.marathivishwakosh) आता मोबाईल ॲपवर उपलब्ध आहेत. तरी भाषा गौरव दिनाच्या औचित्याने सदर ॲपचा वापर / प्रसार होईल याद्दष्टीने महाविद्यालये, विद्यार्थी, शिक्षक यांनी प्रयत्न करावेत.

४) शासनाचे मराठी शब्दकोश / शासनव्यवहार कोश व विविध परिभाषा कोश यांतील माहिती आता एकत्रितपणे https://shabdakosh.marathi.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात येणार आहे. मराठी भाषा गौरव दिनी सदर संकेतस्थळाचे लोकार्पण प्रस्तावित आहे. भाषा गौरव दिनाच्या औचित्याने सदर संकेतस्थळावरील माहिती सर्वांनी जाणून घेण्याकरीता या संकेतस्थळाला भेट द्यावी.

५) मातृभाषेची महती आणि माहिती, तसेच मातृभाषेचे व्यक्तिगत व समाजजीवनातील स्थान आणि मातृभाषेचे मानसशास्त्रीय व शिक्षणशास्त्राच्या दृष्टीने महत्व या विषयांवर विचारमंथनात्मक कार्यक्रम आयोजित करावे,

६) सकस साहित्याची, नव्या माहितीची, आधुनिक विज्ञान व तंत्रज्ञानाची मराठीतील पुस्तके वाचकांपर्यंत पोहोचविण्याच्या हेतूने राज्यभर ग्रंथप्रदर्शन / ग्रंथोत्सव / ग्रंथदिंडी आयोजित करणे,

७) शाळा / महाविद्यालय / शासकीय व निमशासकीय कार्यालये / खाजगी संस्थांमध्ये विविध स्तरांवर मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृतीविषयक विविध प्रकारच्या स्पर्धा (निबंध, वक्तृत्व इ.) आयोजित करणे,

८) न्यायव्यवहार, शासन प्रशासन, प्रसार माध्यमे, केंद्र तथा राज्य शासनाची कार्यालये, इतर अशासकीय कार्यालये इत्यादी ठिकाणी होणारा मराठी भाषेचा वापर याबाबत व्याख्याने , चर्चासत्रे, परिसंवाद, कार्यशाळा, सादरीकरणे यांचे आयोजन, मराठी भाषेतून न्यायदान देण्याच्या कामास गती मिळावी याद्दष्टीने विधी महाविद्यालयांनी “मराठी अभिमत न्यायालय”(Marathi Moot Court) च्या स्पर्धांचे आयोजन करावे.

९) मराठी भाषा गौरव दिनानिमित्त शासनाच्या विविध भाषा व साहित्यविषयक उपक्रमांना प्रसिध्दी देणे,

१०) आकाशवाणी व दूरदर्शनवरुन सादर करण्यात येत असलेल्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या प्रायोजित कार्यक्रमामध्ये मराठी भाषाविषयक मान्यवरांच्या मुलाखती, परिसंवाद आयोजित करणे,

११) मराठी भाषा / साहित्य / कोश वाङ्मय या विषयांवर व्याख्याने, चर्चासत्रे, परिसंवाद, कार्यशाळा यांचे आयोजन तसेच तज्ज्ञ, विचारवंत व साहित्यिकांच्या मुलाखतींचे आयोजन करणे,

१२) प्रसारमाध्यमे तसेच प्रशासनात मराठी भाषेचा वापर याबाबत व्याख्याने, चर्चासत्रे, परिसंवाद, कार्यशाळा, सादरीकरणे यांचे आयोजन करणे,

१३) युनिकोडप्रणित मराठी आणि इन्स्क्रिप्ट मराठी कळफलक संबंधित विषयांवरील प्रशिक्षण कार्यशाळांचे आयोजन करणे,

१४) समाजप्रसार माध्यमांतील (सोशल मीडिया) मराठी, माहिती तंत्रज्ञान व मराठी, महाजालावरील (इंटरनेट) मराठी या क्षेत्रांतील तज्ज्ञांची व्याख्याने व सादरीकरणे यांचे आयोजन करणे,

१५) मराठी विकीपिडीयावर लेख / माहिती लिहिण्यासाठी शाळा / महाविद्यालये / शासकीय कार्यालये यामध्ये कार्यशाळा भरविणे,

१६) कुसुमाग्रज व इतर सुप्रसिद्ध थोर मराठी साहित्यिकांच्या साहित्यावर आधारित कार्यक्रमांचे आयोजन करणे,

१७) दिवंगत साहित्यिकांच्या जन्मगावी / कर्मभूमी येथे स्थानिक शाळांच्या / ग्रंथालयांच्या मदतीने शाळा / ग्रंथालये / वाचनालये येथे स्थानिक शिक्षण संस्था / महाविद्यालये यांचेमार्फत दिवंगत साहित्यिकांचे स्मरण करुन त्यांच्या गौरवार्थ कार्यक्रमाचे आयोजन करणे,

१८) मराठी वर्णमालेबाबत सादरीकरण किंवा व्याख्याने यांचे आयोजन करणे,

१९) बोली भाषांवरील कार्यक्रमांचे आयोजन करणे (व्याख्याने, चर्चासत्रे, सादरीकरणे... इ.),

२०) शब्दभांडार आणि नवीन पर्यायी शब्दनिर्मिती याबाबतच्या स्पर्धांचे आयोजन करणे,

२१) म्हणी, वाक्प्रचार, प्राचीन शब्द यांची व्युत्पत्ती - या विषयांवर रंजक व्याख्याने / सादरीकरणे,

२२) मराठी सुलेखन, सुंदर मराठी हस्ताक्षर स्पर्धा व संबंधित कार्यशाळांचे आयोजन करणे,

२३) मराठी कविता, प्रसिद्ध उतारे, मराठी भाषाविषयक घोषवाक्ये यांचे भित्तीचित्र प्रदर्शन किंवा स्पर्धेचे आयोजन करणे,

२४) मोडी लिपी चे प्रशिक्षण, व्याख्यान किंवा परिसंवादाचे आयोजन करणे,

२५) मराठी भाषेच्या सर्वांगीण विकासासाठी कार्य करणाऱ्या नि:स्पृह व्यक्तींना आणि त्यांनी निर्माण केलेल्या संस्थाना किंवा प्रकल्पांना भेट देणे,

२. सर्व मंत्रालयीन विभाग, विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी आपआपल्या विभागातील कार्यक्षेत्रातील संबंधितांचे सहकार्य घेऊन हा सोहळा पार पाडण्यासाठी सर्व अधिकारी / कर्मचारी यांना सहभागी करुन घ्यावे.

३. सदर उपक्रमांकरीता होणारा खर्च, प्रत्येक वित्तीय वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली कार्यालयीन खर्चासाठी मंजूर होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०२०६१७२८१७७५३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Marathi Language
Date: 2019.02.07 11:41:06 +05'30'

**(अपर्णा अ. गावडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४. मा.सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई, (दूरदर्शन / आकाशवाणी / वृत्तपत्रे / भित्तीपत्रके या माध्यमातून विस्तृत प्रसिध्दी देण्यासाठी),
१२. सर्व मंत्रालयीन विभाग (त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांना सूचना देण्याबाबत),
१३. सर्व विभागीय आयुक्त,
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६. भाषा संचालक, भाषा संचालनालय, बांद्रा, मुंबई,
१७. अध्यक्ष / सचिव महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१८. अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
१९. संचालक / प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२०. मराठी भाषा विभाग / सर्व कार्यासने,
२१. निवड नस्ती (भाषा-३).